

**महाराष्ट्र शासन**

**Email ID**: deskkh२-rfd@mah.gov.in **दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७**

---

क्रमांक :गौखनि -३५/१०२०/प्र.क्र.२४२/ख-२

महसूल व वन विभाग
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२१

**विषय : गौण खनिज-जालना**
**सन २०१७-१८ करीता मौजे कानडी-३, ता. मंठा या वाळूगटातून मंजूर वाळूपैकी उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत करणेबाबत.**
**- श्री. नितीन काशिनाथ पाटील.**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, जालना यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र.जा.क्र.२०२०/मशाका/गौ.ख./कावी ५८२, दि.२०.१०.२०२० रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१७-१८ करीता मौजे कानडी-३, ता. मंठा हा वाळूगट ई-लिलावान्वये रू.१,५०,३७,४५४/- (रूपये एक कोटी पन्नास लाख सदतीस हजार चारशे चोपन फक्त) इतक्या सर्वोच्च बोलीने श्री. नितीन काशिनाथ पाटील यांना ८४८१ ब्रास वाळूसाठ्याकरीता मंजूर करण्यात आला. लिलावधारकाने लिलावाच्या रकमा शासनजमा केल्यानंतर लिलावधारकास सदर वाळूगटाचा ताबा मंडळ अधिकारी व तलाठी यांनी दिला.

०२. तद्नंतर, सदर वाळूगटाबाबत प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने जिल्हा खनिकर्म अधिकारी यांनी वाळूगटाची जायमोक्यावर जाऊन मोजणी केली. सदर मोजणीमध्ये लिलावधारक यांनी मंजूरीपेक्षा जास्त वाळूचे उत्खनन केल्याचे दिसून आल्याने अपर जिल्हाधिकारी, जालना यांनी दि.१३.०७.२०१८ रोजीच्या आदेशान्वये मौजे कानडी-३, ता. मंठा हा वाळूगट रद्द करून लिलावधारकाची अनामत रक्कम रू. १९,२३,४९१/- (रूपये एकोणीस लाख तेवीस हजार चारशे एक्क्याण्णव फक्त) जप्त केली. तसेच, लिलावधारकाने मंजूर वाळूगटातून मंजूरीपेक्षा जास्त उत्खनन केल्याने रू.३,१८,००,०००/- इतका दंड आकारण्यात आला.

०३. जिल्हाधिकारी, जालना यांच्या आदेशाविरूध्द लिलावधारक यांनी मा. अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेकडे अपील दाखल केले असता, मा. अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी दि.२०.०१.२०२० रोजीच्या आदेशान्वये लिलावधारक श्री. पाटील यांचा अपील अर्ज नामंजूर करून अपर जिल्हाधिकारी, जालना यांचे आदेश कायम केले.

सदर आदेशाविरूध्द लिलावधारक यांनी मा. राज्यमंत्री (महसूल) यांच्याकडे अपील दाखल केले असता, मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दि.०१.१२.२०२० रोजीच्या आदेशान्वये तसेच शुध्दीपत्रक दि.०५.०१.२०२१ अन्वये अपिलार्थी यांनी उत्खनन न केलेल्या ४३६४ ब्रास वाळूची रक्कम तसेच अनामत रक्कम परत करण्याचे आदेश पारीत केले. सदर आदेशानुसार लिलावाधारक यांना वाळूगटातून मंजूर वाळूचे उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रू.७७,३७,६७७/- (रूपये सत्त्याहत्तर लाख सदतीस हजार सहाशे सत्त्याहत्तर फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३.     श्री. पाटील यांना रक्कम रू.७७,३७,६७७/- (रूपये सत्त्याहत्तर लाख सदतीस हजार सहाशे सत्त्याहत्तर फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करून घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०४.     या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५.     सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६.     सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२११००११८०७२४४५१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2021.10.01 18:09:15 +05'30'

**( स. गो. मोहिते )**

कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी, जालना.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२ नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.
६) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.